**वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक ते पाच मध्ये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये नव्याने समाविष्ट वित्तीय अधिकार**

---

**१) भाग-पहिला, उप विभाग-दोन, अनुक्रमांक-३-अ, २८-ड, ४४-अ व ४९**

**२) भाग-पहिला, उप विभाग-चार, अनुक्रमांक-१४**

**३) भाग-पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक-१०**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र.६३/२००१/विनियम**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक : २० मार्च, २००२**

**वाचा :-** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक - विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनिमय, दिनांक ११.७.२००१

## शासन निर्णय

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-१०००/प्र.क्र.४६/ २००१/ विनियम, दिनांक ११ जुलै, २००१ नुसार राज्य शासनाचे प्रशासनिक विभाग प्रमुख प्रशासनिक विभागातर्गंत विभाग प्रमुख, क्षेत्रिय विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. सदर वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उप विभाग-एक ते पाच पैकी प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांमध्ये **नव्याने** वित्तीय शक्तींचा समावेश करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ११ जुलै २००१ अन्वये सुधारित केलेल्या वित्तीय अधिकार नियमावली, १९७८ मधील अधिकारात भाग-पहिला -

**उप विभाग - दोन** : मध्ये अनुक्रमांक-३-अ, २८-ड, ४४-अ व ४९

**उप विभाग - चार** : मध्ये अनुक्रमांक - १४ आणि

**उप विभाग - पाच** : मध्ये अनुक्रमांक - १० नव्याने समाविष्ट करण्यात येत असून शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे राज्य शासनाचे प्रशासनिक विभाग प्रमुख, प्रशासनिक विभागांतर्गत विभाग प्रमुख, क्षेत्रिय विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना वित्तीय अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

३. हया आदेशान्वये प्रदान केलेल्या शक्तींचा वापर हा अर्थसंकल्पीय तरतूद आणि वित्तीय प्रकाशने, नियम व विनियमन हयामध्ये समाविष्ट केलेल्या किंवा अंमलात असलेल्या आदेशांस अधीन राहील.

४. ज्या प्रशासकीय विभागांना, विभाग प्रमुखांना व इतर प्राधिकाऱ्यांना वेळोवेळी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. जेथे एखाद्या अधिकाऱ्याचे असे विद्यमान अधिकार वित्तीय मर्यादेच्या किंवा इतर कोणत्याही शक्तींच्या दृष्टीने अधिक उदार असतील तेथे, असे अधिकार ज्या शर्तींच्या अधीन प्रदान करण्यात आले असतील त्या शर्तींच्या अधीन ते अधिकार यापुढेही अंमलात राहतील असे मानले जाईल.

५. ज्या प्रशासनिक विभागांना, विभाग प्रमुखांना व इतर प्राधिकाऱ्यांना वेळोवेळी अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत त्यांनी अशाप्रकारे त्यांना प्रदान करण्यात केलेल्या अधिकारांचा सर्व स्तरांवर कोणताही हस्तक्षेप, भिती अथवा अनुग्रह याशिवाय त्याचा पूर्णपणे व परिणामकारक वापर करण्यात येत असल्याची खात्री करुन घ्यावी.

६. वित्तीय अधिकार नियमावली-१९७८, भाग-पहिला आणि संबंधित नियम यामध्ये जेथे सुधारणा आवश्यक आहेत, अशा आवश्यक सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**अं.ज.खानविलकर**
**कार्यासन अधिकारी, वित्त विभाग**

**सहपत्र - विवरणपत्र**

**प्रति,**

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१,
महाराष्ट्र,मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१,
महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२,
महाराष्ट्र, नागपूर
* महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र,
४. नागपूर
राज्यपालांचे सचिव
५. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
६. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
७. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
८. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे
९. अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे(पूर्व), मुंबई
१०. ४०० ०५१
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१३. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,
१४. कोकणभवन, नवी मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),
* १६. मुंबई
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,
१७. कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय
आवार, मुंबई
प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ
* १८. सचिवालय, मुंबई

* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त
यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय,
नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१
२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण
विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/
नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक
निधी लेखा,कोकण विभाग, नवी मुंबई/ पुणे/
नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. सर्व उप कोषागार अधिकारी
२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या
नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,
प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि
कार्यालय प्रमुख
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (कार्यासन
-हाऊसिंग सेल, १९ -सी ),मंत्रालय, मुंबई - ३२
२८. सर्व विभागीय आयुक्त
२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी
३२. अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य
३३. लेखा व वित्त अधिकारी
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस
३४. रोड, नवी दिल्ली ११० ००१
संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र,
अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग
३५. मार्ग, नवी दिल्ली ११०००१
३६. वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, कार्यासन - विनियम, वित्त विभाग

* पत्राद्वारे.

(शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक - विअप्र-१०००/प्र.क्र.६३/२००१/विनियम, दिनांक २० मार्च, २००२ चे परिशिष्ट )

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८

## *भाग-पहिला*

## उप-विभाग--दोन

महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये **"नव्याने"** प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार

भाग-पहिला, उप-विभाग--दोन

| अनु-क्रमांक | नियम क्रमांक | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| ३-अ | ७ | अस्तित्वात असलेल्या यंत्र सामुग्रीचे रुपांतरण करण्यास व त्यासाठीच्या खर्चास मंजूरी देणे. | प्रशासनिक विभाग | पूर्ण अधिकार | (१) रुपांतरणाचा खर्च घसाऱ्यानंतरच्या किंमतीच्या २५% हून जास्त नसावा.<br>(२) रुपांतरणानंतर किमान ५ वर्ष यंत्रसामुग्री सेवेत राहायला हवी.<br>(३) अर्थसंकल्पित तरतूद असावी. |
| **२८-ड** | **७६** | **फॅक्स मशिन व फॅक्स रोल, इत्यादी सामग्री खरेदी खर्चाला मंजूरी देणे.** | **प्रशासनिक विभाग** | **पूर्ण अधिकार** | **(१) खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.<br>(२) प्रथमतः एस.टी.डी. सुविधेसह दूरध्वनीस मंजूरी सा.प्र.वि. कडून प्राप्त करुन घ्यावी.<br>(३) दर करारावरील मॉडेल दर करारावरील कंपनीकडून खरेदी करण्यात यावे.<br>(४) फॅक्स रोल व इत्यादी सामग्री विहित पध्दतीने मागविण्यात यावी.** |
| ४४-अ | १४० | शासकीय प्रकाशनांची किंमत ठरविणे तसेच ती कमी करणे किंवा वाढविणे. | प्रशासनिक विभाग | पूर्ण अधिकार | (१) छपाईची किंमत वसूल व्हायला हवी.<br>(२) नागरिकांसाठी सनद या प्रकाशनाची किंमत उपरोक्त (१) मधील किंमतीचे १० टक्के पर्यंत कमी करता येईल. |
| **४९** | **१६६** | **औद्योगिक न्यायालय व कामगार न्यायालयातील मूळ प्रकरणामध्ये व अपील प्रकरणामध्ये शासनाची बाजू मांडण्यासाठी नियुक्त वकीलाची फी ठरविणे व ठरविलेल्या फी च्या खर्चाला मंजूरी देणे.** | **प्रशासनिक विभाग** | शासन निर्णय विधी व न्याय विभाग, क्रमांक जीपीएच-४३९८/(१७३)-चौदा, दिनांक ३० जानेवारी, १९९९ सोबतच्या मूळ व अपील प्रकरणासाठी अनुक्रमे विववरणपत्र डी मध्ये नगर दिवाणी न्यायालयामध्ये प्रकरणे हाताळण्यासाठी विहित केलेल्या व अपील प्रकरणासाठी विवरणपत्र सी (१) मध्ये उच्च न्यायालय (मूळ बाजू) मुंबई येथील प्रकरणे हाताळण्यासाठी विहित केलेल्या आणि त्यामध्ये वेळोवेळी होणाऱ्या सुधारणांच्या मर्यादांच्या अधीन राहून पूर्ण अधिकार. | **(१) खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.** |

## वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८

**भाग-पहिला उप-विभाग-चार**

खर्चाच्या संकीर्ण बाबीसंबंधी **"नव्याने"** प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार

**भाग-पहिला, उप-विभाग-चार**

| अनु. क्रमांक | वित्तीय शक्तींचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १४ | कार्यालयातील अभिलेखाचे कीटक, जिवाणू इत्यादींपासून संरक्षणाची व्यवस्था, आवश्यक असल्यास त्यासाठी वस्तूंची खरेदी करणे व त्याअनुषंगाने होणाऱ्या खर्चास मंजूरी देणे. | (१) विभाग प्रमुख,<br>(२) प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br>(३) कार्यालय प्रमुख | पूर्ण अधिकार | (१) खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा .<br>(२) निविदा प्रक्रिया अवलंबून सेवा पुरवठादाराची नियुक्ती करण्यात यावी . |

## वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८

**भाग-पहिला उप - विभाग - पाच**

महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखाली **"नव्याने"** प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार

| अनु. क्रमांक | नियम क्रमांक | वित्तीय शक्तींचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| **(१)** | **(२)** | **(३)** | **(४)** | **(५)** | **(६)** |
| १० | १३४ | सार्वजनिक बांधकाम विभागाच्या परिरक्षणासाठी ताब्यात नसलेल्या इमारतीच्या सर्वसाधारण दुरुस्ती व विशेष दुरुस्तीस प्रशासकीय (वित्तीय मान्यता धरुन ) मान्यता देणे व खर्चाला मंजूरी देणे. | प्रशासनिक विभाग | पूर्ण अधिकार | (१) महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम विभाग नियमपुस्तिके मधील प्रशासकीय मान्यता देण्याच्या नियमांच्या व तद्अनुषंगीक नियमांचे अनुपालन करण्यात यावे.<br>(२) दुरुस्तीचे काम विहित निविदा पध्दती अवलंबून सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत, संबंधित प्रशासनिक विभागांकडे कार्यकारी अभियंता किंवा त्यावरील दर्जाचे पद असल्यास प्रशासनिक विभागांमार्फत कंत्राटदाराची नेमणूक करुन करण्यात यावे.<br>(३) अर्थसंकल्पिय तरतूद उपलब्ध असली पाहीजे. |

# वित्तीय अधिकार नियम पुस्तिका , १९७८

## भाग - पहिला

## उप-विभाग -- दोन

महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ मधील अधिकारांच्या शक्तींच्या अटींमध्ये सुधारणा

भाग-पहिला, उप-विभाग--दोन

| अनु क्रमांक | नियम क्रमांक | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १९ | ६९ | शासकीय वाहनांच्या देखभाली-वरील, ती सुस्थितीत ठेवण्यासाठी आणि त्यांच्या दुरुस्तीसाठीच्या खर्चास मंजूरी देणे [पेट्रोल, डिझेल, इंजिन ऑईल यांवरील खर्चाचा (या शक्तीच्या वर्णनात) अंतर्भाव राहणार नाही ]. | (१) प्रशासनिक विभाग | (१) पूर्ण अधिकार | (६) विभाग प्रमुख त्यांच्या स्वतःच्या कार्यालयातील प्रशासन/ लेखा विषयक कार्यभार सांभाळणाऱ्या राजपत्रित अधिकाऱ्याला हया शक्ती पुनःप्रदान करु शकतील. |
| | | | (२) विभाग प्रमुख<br>(३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख | (२) व (३)<br>(अ) पेट्रोलवर चालणाऱ्या प्रत्येक वाहनासाठी प्रतिवषी रु. २५,००० पर्यंत<br>(ब) डिझेलवर चालणाऱ्या प्रत्येक वाहनासाठी प्रतिवर्षी रु.३०,००० पर्यंत. | |
| | | | (४) कार्यालय प्रमुख | (४)<br>(अ) पेट्रोलवर चालणाऱ्या प्रत्येक वाहनासाठी प्रतिवर्षी रु.६,००० पर्यंत.<br>(ब) डिझेलवर चालणाऱ्या प्रत्येक वाहनासाठी प्रतिवर्षी रु.८,००० पर्यंत. | |
| १९-अ | ६९ | कार्यालयीन वाहने (स्टाफ कार) व शासकीय वाहनांसाठी पेट्रोल/ डिझेल/वंगण तेल/ इंजिन ऑईल/ सी.एन.जी. खरेदी करण्यासाठी खर्च मंजूर करणे. | (१) प्रशासनिक विभाग | पूर्ण अधिकार | (३) विभाग प्रमुख त्यांच्या स्वतःच्या कार्यालयातील प्रशासन/ लेखा विषयक कार्यभार सांभाळणाऱ्या राजपत्रित अधिकाऱ्याला हया शक्ती पुनःप्रदान करु शकतील. |
| | | | (२) विभाग प्रमख<br>(३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख | (२) व (३)<br>(अ) त्यांच्या स्वाधीन असलेल्या "स्टाफ कार" करिता प्रतिवर्षी ३,००० लिटर /३,००० किलोग्रॅमपर्यंत.<br>(ब) त्यांच्या दुय्यम अधिकाऱ्यांच्या स्वाधीन असलेल्या "स्टाफ कार" करिता, जर त्यांच्या संदर्भात विहित केलेल्या मर्यादेबाहेर जास्त खर्च होणार असेल तर प्रतिवर्षी १००० लिटर / १००० किलोग्रॅमपर्यंत. | |
| | | | (४) कार्यालय प्रमुख | (४) प्रतिवर्षी २००० लिटर /२००० किलोग्रॅमपर्यंत. | |

| अनु क्रमांक | नियम क्रमांक | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| २०-अ | ७३ | छायाप्रती (फोटो कॉपीइंग) चक्रमुद्रण, अमोनिया ब्ल्यू प्रिंट्स छपाई, कोर्ट फी मुद्रांक, वगैरे प्रयोजनासाठी जेव्हा असा खर्च तातडीच्या वेळी करणे क्रमप्राप्त असते त्यासाठीच्या खर्चास मंजूरी देणे. | (१) विभाग प्रमुख<br>(२) प्रादेशिक कार्यालय प्रमुख<br>(३) कार्यालय प्रमुख | पूर्ण अधिकार | (३) विभाग प्रमुख त्यांच्या स्वत:च्या कार्यालयातील प्रशासन/ लेखा विषयक कार्यभार सांभाळणाऱ्या राजपत्रित अधिकाऱ्याला हया शक्ती पुन:प्रदान करु शकतील. |
| २४-अ | ७६ | जुनी/ झिजलेली टंकलेखनयंत्रे आणि उपयोगासाठी अपात्र अशी टंकलेखन यंत्रे निकामी ठरविणे. | (१) विभाग प्रमुख<br>(२) प्रादेशिक कार्यालय प्रमुख | (१) व (२) पूर्ण अधिकार | (३) विभाग प्रमुख त्यांच्या स्वत:च्या कार्यालयातील प्रशासन/ लेखा विषयक कार्यभार सांभाळणाऱ्या राजपत्रित अधिकाऱ्याला हया शक्ती पुन:प्रदान करु शकतील. |
| २८-अ | ७६ | नवीन संगणक यंत्रणा खरेदी करणे आणि/ किंवा सध्या उपलब्ध असलेल्या संगणक यंत्रणेत वाढ/ त्याची श्रेणीवाढ करण्यास मंजूरी देणे, तसेच त्यासाठी आवश्यक असणारी वातानुकूलित यंत्रणेची मांडणी व देखभाल दुरुस्ती. | (१) प्रशासनिक विभाग<br>(२) विभाग प्रमुख<br>(३) प्रादेशिक कार्यालय प्रमुख | पूर्ण अधिकार<br>रु. १,००,००० पर्यंत<br>रु. ५०,००० पर्यंत | (११) विभाग प्रमुख त्यांच्या स्वत:च्या कार्यालयातील प्रशासन/ लेखा विषयक कार्यभार सांभाळणाऱ्या राजपत्रित अधिकाऱ्याला हया शक्ती पुन:प्रदान करु शकतील. |